**मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्प सल्लागार म्हणून नियुक्त केलेल्या मे. पीडब्ल्युसी कंपनीस माहे मार्च, २०१८ ते माहे एप्रिल, २०१८ या कालावधीकरीता केलेल्या कामाचे देयक अदा करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीसीटी -३६१६/प्र.क्र.७६/भाग-२/पोल-३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, २ रा मजला, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १४ जून, २०१८

**<u>वाचा:</u>**

१. माहिती तंत्रज्ञान विभाग व मे. प्राईस वॉटर हाऊस कुपर प्रा.ली. यांच्या दरम्यान झालेला करार दि.१७.११.२००९
२. माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, शासन निर्णय क्रमांक : GAD-मातंस ०८/०४/२०१४- O/O DIRECTORATE OF IT-DIT (MH), दि.०१.०७.२०१४, दि.१९.०७.२०१७ व दि.०९.१०.२०१७
३. गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक : सीसीटी ३६१५/प्र.क्र.९३/पोल-३, दि.२९.०५.२०१५
४. गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक : सीसीटी ३६१५/प्र.क्र.७६/भाग-१/पोल-३, दि.२५.०७.२०१६ व दि.२५.०७.२०१७
५. मे. प्राईस वॉटर हाऊस कुपर प्रा.ली., यांची माहे मार्च, २०१८ ते माहे एप्रिल, २०१८ या दोन महिन्यांच्या कालावधीचे देयकांबाबत दि.१८.०५.२०१८ चे पत्र.

**<u>प्रस्तावना</u> :-**

माहिती व तंत्रज्ञान विभागाने दि.१७.११.२००९ रोजीच्या करारान्वये मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी मे. प्राईस वॉटरहाऊस कुपर्स प्रा.ली., या कंपनीची प्रकल्प सल्लागार म्हणुन नियुक्ती केली आहे. गृह विभाग, शासन निर्णय दि.२५.०७.२०१६ अन्वये मे. पीड्ब्ल्युसी कंपनीला मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सल्लागार म्हणुन मुदतवाढ देण्यात आली आहे. तसेच तद्नंतर गृह विभाग, शासन निर्णय दि.२५.०७.२०१७ अन्वये मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी प्रकल्प सल्लागार म्हणून मे. पीडब्ल्युसी कंपनीला दि.०१.०५.२०१७ ते दि.३०.०४.२०१८ पर्यंत मुतदवाढ देण्यात आली आहे. माहिती तंत्रज्ञान विभागाच्या दि.०१.०७.२०१४ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केल्यानुसार त्यांना मानधन अनुज्ञेय करण्यात आले आहे. सदर कंपनीने उपरोक्त प्रकल्पासंदर्भात प्रकल्प सल्लागार म्हणुन माहे मार्च, २०१८ ते एप्रिल, २०१८ या दोन महिन्याच्या कालावधीसाठी पाहिलेल्या कामाची देयके उपरोक्त संदर्भाधीन क्र.५ येथील नमूद दि.१८.०५.२०१८ च्या पत्रान्वये सादर केली आहेत. त्यानुसार सदर देयके अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी मे. पीड्ब्ल्युसी कंपनीची प्रकल्प सल्लागार म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. माहिती व तंत्रज्ञान विभाग, शासन निर्णय दि.०१.०७.२०१४ अन्वये निश्चित केल्यानुसार त्यांना मानधन अनुज्ञेय करण्यात आले आहे. त्यानुसार मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी मे.पीड्ब्ल्युसी कंपनीने माहे मार्च, २०१८ ते एप्रिल, २०१८ या दोन महिन्यांच्या कालावधीसाठी पाहिलेल्या सल्लागाराच्या कामासाठी (मानधन, इतर खर्च व वस्तू आणि सेवा कर मिळून) रु.१७,४१,५७१/- (अक्षरी रुपये सतरा लाख एकेचाळीस हजार पाचशे एकाहत्तर फक्त) इतक्या रकमेची देयके मे. पीड्ब्ल्युसी कंपनीस अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सदर देयकांचा सविस्तर तपशिल खालीलप्रमाणे आहे :-

**Mumbai CCTV Project (Mar 2018 to Apr 2018)**

| # | Period | Month | Resource Name | Designation | Man Month Rate (INR) | Deployment (Percentage) | Applicable Amount per Resource (INR) | Total Applicable Amount (INR) | OPE Claimed (INR) | Sub Total (INR) | GST @ 18% | Total Amount (INR) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| A | B | C | D | E | F | G | H = FXG | I | J | K = I+J | L = 18% OF K | M = K+L |
| 1 | 01st Mar 2018 to 30th April 2018 | Mar-18 | Subhash Patil | Principal Consultant | 275,000 | 50% | 137,500 | 715,000 | 11,901 | 726,901 | 130,842 | 857,743 |
| | | | Nikhil Pande | Principal Consultant | 275,000 | 50% | 137,500 | | | | | |
| | | | Himanshu Goyal | Senior Consultant | 220,000 | 100% | 220,000 | | | | | |
| | | | Abul Zaidi | Senior Consultant | 220,000 | 100% | 220,000 | | | | | |
| 2 | | Apr-18 | Subhash Patil | Principal Consultant | 275,000 | 50% | 137,500 | 715,000 | 34,007 | 749,007 | 134,821 | 8,83,828 |
| | | | Nikhil Pande | Principal Consultant | 275,000 | 50% | 137,500 | | | | | |
| | | | Himanshu Goyal | Senior Consultant | 220,000 | 100% | 220,000 | | | | | |
| | | | Abul Zaidi | Senior Consultant | 220,000 | 100% | 220,000 | | | | | |
| **Total** | | | | | | | | **1,430,000** | **45,908** | **14,75,908** | **265,663** | **17,41,571** |

**टीपः-**

अ) उपरोक्त रकमा या संदर्भात नमुद शासन निर्णय क्र.२ मध्ये नमुद शासन निर्णयान्वये निश्चित केल्यानुसार सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सल्लागारांना दरमहिना दरमाणुस (Man-Month) तत्वानुसार अदा करण्यात येत आहे.

ब) शासन निर्णय संदर्भ क्र.२ नुसार सल्लागारांना प्रकल्पावर होणा-या खर्चाच्या ५ % च्या प्रमाणात प्रवास, भोजन व निवास इ. खर्च अनुज्ञेय करण्यात आला आहे.

क) संदर्भ क्र.५ अन्वये मे. पीड्ब्ल्युसी कंपनीने सादर केलेल्या देयकानुसार सदर रकमा देण्यात येत आहे. सदर रकमेमध्ये माहे मार्च, २०१८ ते एप्रिल, २०१८ या दोन महिन्यासाठी १८ % वस्तू आणि सेवा कर समाविष्ट करण्यात आला आहे.

ड) सीसीटीव्ही प्रकल्पासाठी संबंधित कंपनीला सल्लागारांच्या मानधनापोटी जादा रक्कम अदा केली आहे असे निदर्शनास आल्यास सदर जादा रक्कम संबंधित कंपनीकडून समायोजीत करण्याचा अधिकार शासनास राहील.

इ) सदर देयके आयकर व इतर प्रचलीत कर वजाती करून अदा करण्यात यावी.

२. प्रस्तुत प्रकरणी येणारा खर्च पोलीस आयुक्त, मुंबई याच्या अधिनस्त असलेल्या “२०५५-पोलीस, (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना, (दत्तमत) (२०५५ ००९७), ५०-इतर खर्च” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी पोलीस आयुक्त, मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. तर त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्याला “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१४१५२१०८८३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Appaji Saste

Digitally signed by Dinesh Appaji Saste
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a49495d0d4b31e36ff1d612a85453ca984b74e28fd6f99cdf66e3e499969e942, cn=Dinesh Appaji Saste
Date: 2018.06.14 15:22:18 +05'30'

**(दिनेश आ. सस्ते)**
कक्ष अधिकारी, गृह विभाग

**प्रत :**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान महालेखाकार (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
५. पोलीस आयुक्त, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी, व्यय-७ / वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. मे. पीडब्ल्युसी प्रा.लि., २५२, वीर सावरकर मार्ग, शिवाजी पार्क, दादर, मुंबई - २८.
११. अर्थ शाखा, गृह विभाग.
१२. निवड नस्ती / पोल-३

*****